मार्शाक

# भांडण कधी करू नये!

## चांगली रीत



# मार्शाक



# चांगली रीत



# भांडण कधी करु नये!





प्रगती प्रकाशन

मॉस्को



# चांगली रीत

होते एक अस्वल पाच-सहा वर्षांचे
शिकवले त्याला काय नाही नि काय करायचे :

“माझ्या बछड्या, नेलं बाहेर जर चहा प्यायला,
मनाई आहे वेडपट किंचाळायला नि गुरगुरायला.
बढाया मारण्याची आणि उद्धट वागण्याची
खाताना मचमच करण्याची, ही लक्षणं खोट्याची.
भेटता ओळखीची माणसं, टोपी काढायला
आणि विसरू नको नमस्ते म्हणायला.



“चालू नको चारी पायांवर खाशा
दातांमध्ये पकडत बसू नको माशा,
असता कुणी भंवती जांभईला वासू नको जबडा,
अगदीच टेकलास तर
सभ्य अस्वलासारखा
पंजाने झाक थोबडा.


"भांडू नको, ओरबाडू नको, नको झोंबाझोंबी.
आज्ञेत रहा आईबापांच्या, दाखव नेहमी अदबी
मोठ्यांचा राख मान.
उदाहरणार्थ, डोळे अधू आज्जीचे
म्हणून पोचवावे घरी तिला रात्रीचे.
वागलास असे तर वाटेल मला अभिमान!"



अंगी अदब मुरवायचे त्याने किती जरी
प्रयत्न केले,
प्रत्यक्षात मात्र ते नंबर एकचे डांबीस बनले.
भुऱ्या अस्वलांपासून कोल्हयांपर्यंत
ओळखीच्या कुणापुढेही ते मान तुकवी.
उठून उभा राही आणि आपले आसन देई
वागणे त्याचे एकूण जशी गोड मिठाई.
मात्र नव्हता जाणत ज्यांना
बापरे – अर्ध्या भलेपणाचाही नसे रहात ठिकाणा.
गुरगुरणे काय, फिस्कारणे काय, शिव्या काय,
मधमाशा नि पाखरांना करी दे माय धरणी ठाय.



आणि चालताना रस्त्याने भुयारी
विचकी दात नि प्रत्युत्तर करी
रेटून प्रवाशांना दूर
करी त्यांच्या हाडांचा चक्काचूर.



उद्धट लहान्या अस्वलाला लावायला रीत चांगली
लागतो बक्कळ वेळ आणि लागते देखभाली,
तरीही – स्पष्ट सांगते आमची कहाणी –
कधी कधी पालथ्या घड्यावर पडते पाणी !

# भांडण कधी करू नये!




टिम आणि टॉम
होती दोन मांजरे.
मऊ मुलायम केसांचा कोट
आणि पांढरेशुभ्र पायबंद.

एके दिवशी, कुणास ठाऊक झाला काय घोळ,
त्या मांजरांनी मांडला एकच गदारोळ.
टिम चावले टॉमला आणि टॉम टिमला.
हातघाईच्या लढाईचा एकच गोंधळ माजला.



ओरडून किंचाळून ओढल्या त्यांनी चिंधोटया
आता शिल्लक राहिल्या फक्त त्यांच्या शेपटया
तेव्हा मित्रांनो, एकच माझे सांगणे
दुर्दशा होईल जर केलीत आपसात भांडणे!





